ग्रामभारती शिक्षण संस्था संचलीत कै.पुज्य बाबासाहेब परांजपे निवासी अपंग विद्यालय, अंबाजोगाई, जि.बीड या शाळेवरील प्रशासक नियुक्तीस मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. इडीडी २०१७/प्र.क्र.५७७/अ.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ६ ऑक्टोबर, २०२१.

वाचा:- १) **शासन निर्णय समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २००४/प्र.क्र.३/सुधार-२, दि.९ मार्च, २००४.**

२) **आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.दिकआ/बाबासाहेब परांजपे/बीड/प्रशासक नियुक्ती/२०२०-२१/५२०३, दि.३०.७.२०२१.**

३) **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.इडीडी-२०१७/प्रक्र.५७७/ अ.क.१, दि.२९.०५.२०१८**

**शासन निर्णय -**

ग्रामभारती शिक्षण संस्था संचलीत कै.पुज्य बाबासाहेब परांजपे निवासी अपंग विद्यालय, अंबाजोगाई, जि.बीड या शाळेची जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी तपासणी केली असता, सदर तपासणीमध्ये शाळेच्या व्यवस्थापकांकडून शाळेच्या खालील नियमांचे पालन होत नसल्याचे आढळून आल्याने त्याबाबतचा अहवाल आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी शासनास पाठविला आहे.

ग्रामभारती शिक्षण संस्था संचलीत कै.पुज्य बाबासाहेब परांजपे निवासी अपंग विद्यालय, अंबाजोगाई, जि.बीड या संस्थेमध्ये सक्षम कार्यकारणी नसून अंतर्गत वाद मोठया प्रमाणावर आहे. सदरील संस्था मतिमंदाची शाळा चालविण्यास सक्षम नाही. तसेच अस्थिव्यंग विद्यार्थ्यांचे शैक्षणिक, सामाजिक, व्यवसायिक पुर्नवसन करणे सोडून संस्था चालक व कर्मचारी आपआपसात मतभेद निर्माण करणे, भांडण-तंटे करणे, एकमेकांवर फौजदारी प्रक्रिया करणे, अशा प्रकारांचे गंभीर वाद आहेत. त्याचप्रमाणे सदरहू संस्थेस अपंग क्षेत्रात उपक्रम चालविण्यासाठी देण्यात आलेल्या अपंगांच्या विशेष शाळांचे उद्देश साध्य होत नसल्याचेही तपासणीमध्ये आढळून आले आहे. तसेच सदर संस्थेच्या कार्यकारणीचा वाद हा धर्मादाय आयुक्त, यांच्याकडे सद्य:स्थितीत न्यायप्रविष्ठ आहे.

२. स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविल्या जाणा-या अपंगांच्या विशेष शाळा/कर्मशाळा व्यवस्थापनेसाठी प्रशासकांची नियुक्ती करण्यासंदर्भातील शासन निर्णय दि.९.३.२००४ मधील तरतूदीनुसार तसेच अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतूदीनुसार अपंग विद्यार्थ्यांस सोईसुविधा पुरविण्यास व्यवस्थापन सक्षम असल्याची खात्री होईपर्यंत अशा संस्थेचे व्यवस्थापन ताब्यात घेऊन शाळेच्या कामकाजात सुधारणा होईपर्यंत अथवा

व्यवस्थापनातील मतभेद संपेपर्यंत परंतु, प्रशासकाचा कालावधी तीन वर्षापेक्षा जास्त असणार नाही, यापैकी जी घटना अगोदर घडेल तोपर्यंत त्या संस्थेवर प्रशासकांची नियुक्ती करण्याबाबतचे अधिकार शासनास राहील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

३. त्यामुळे सदर संस्थेला प्रशासकास नियुक्ती देण्याबाबत आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी शिफारस केल्यानुसार जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांची सदर संस्थेच्या प्रशासक पदावर दि.२९.०५.२०१८ अन्वये ३ वर्षाकरीता नियुक्ती करण्यात आली होती. सदरची प्रशासक नियुक्ती संपूष्टात आल्याने सदरहू प्रशासकाच्या नियुक्तीस या शासन निर्णयान्वेय पुढील ३ वर्षाची मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. दरम्यानच्या काळात संस्थेचे कामकाज सुरळीत झाल्याबाबतचा अहवाल आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांच्याकडून शासनास अहवाल प्राप्त झाल्यास त्याप्रमाणे सदर शाळेवर नेमणूक केलेल्या प्रशासकाबाबत उचित निर्णय घेण्यात येईल.

५. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड तसेच जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी सदर शाळेचे दैनंदिन कामकाज सुरळीतरित्या पार पाडले जाईल याबाबत उचित कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचे संकेतांक २०२११०११४५२४३६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.11 15:01:22 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
२) अपर मुख्य सचिव (सा.न्या.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
५) प्रादेशिक उप आयुक्त समाज कल्याण विभाग, लातूर
६) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९) अध्यक्ष, ग्रामभारती शिक्षण संस्था संचलीत कै.पुज्य बाबासाहेब परांजपे निवासी अपंग विद्यालय, अंबाजोगाई, जि.बीड
१०) निवड नस्ती, अपंग कल्याण-१.